जिल्हा क्रीडा अधिकारी, क्रीडा व युवक
सेवा, गट-अ
मधील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संक्रीआ १०१७/प्र.क्र.५५/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ मे, २०१७

**-शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दि. १ जुलै, २००६ पासून अंमलात आला आहे. जिल्हा क्रीडा अधिकारी, गट-अ संवर्गातील अधिका-यांची बदलीने पदस्थापना सक्षम प्राधिका-यांच्या पूर्वमान्यतेने करण्यात येत आहे. खालील तक्त्यात नमूद केलेल्या अधिका-यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. संजय अरविंद सबनीस | जिल्हा क्रीडा अधिकारी, नाशिक | जिल्हा क्रीडा अधिकारी, धुळे |
| २ | श्री. शेखर भीमराव पाटील | जिल्हा क्रीडा अधिकारी, अकोला | जिल्हा क्रीडा अधिकारी, बुलढाणा |
| ३ | श्री. रविंद्र छगनराव नाईक | जिल्हा क्रीडा अधिकारी, धुळे | विनंती बदलीने जिल्हा क्रीडा अधिकारी, नाशिक येथे |

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक- सीडीआर १०८२/ २५६७/ २८/ अकरा , दि. ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी संदर्भाधीन आदेशात नमूद केल्याप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.
४. सदर आदेश बदली अधिनियम २००५ मध्ये नमूद कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११७२७४९५०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh B Mamadapure

Digitally signed by Santosh B Mamadapure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400058, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, cn=Santosh B Mamadapure
Date: 2017.05.31 19:56:48 +05'30'

**( सं.ब. ममदापुरे)**

कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा संचालनायामार्फत).
३. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/अकोला/धुळे/बुलढाणा
४. संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनायामार्फत).

**प्रत, (माहितीस्तव )**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. अ.स.(क्रीयुसे-३) / क.अ.(क्रीयुसे-१), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
४. निवडनस्ती, क्रीयुसे-२